**९ ऑगस्ट छोडो भारत स्मृतीदिनी पुण्यतिर्थ बॅलेचे व शहीद स्मारकास प्रभात फेरीचे आयोजन या सांस्कृतिक कार्यक्रमास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीण ८२२३/प्र.क्र.५२८/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ९ ऑगस्ट, २०२३

<u>वाचा</u> :- सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./ ४१४७, दिनांक २४ जुलै, २०२३.

<u>प्रस्तावना</u> :-

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" या उपक्रमाच्या निमित्ताने विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येत आहेत. सदर कार्यक्रमांर्गत स्वातंत्र चळवळीतील व्यक्ती घटना इ. बाबत तरुण पीढीला माहिती व्हावी तसेच देश भावनेची प्रेरणा निर्माण व्हावी या हेतूने सांस्कृतिक कार्य विभागामार्फत स्वातंत्र्याशी निगडीत विविध कार्यक्रामांचे आयोजन करण्यात येते. ४० कलाकारांच्या संचात उत्कृष्ट संगीतानी नटलेल्या जवळपास ६५ प्रसंगावर आधारीत वेदकाळापासून ते आजच्या काळापर्यंतचा प्रवास दाखविण्यात येणार आहे. या पार्श्वभुमी आयोजित सांस्कृतिक कार्यक्रम व आयोजन खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

छोडो भारत स्मृतीदिनानिमित्त दिनांक ९ ऑगस्ट, २०२३ रोजी मुंबई येथे सांस्कृतिक कार्यक्रम व प्रभातफेरी आयोजित सांस्कृतिक कार्यक्रम व त्यासाठीच्या आयोजन खर्च रुपये ७,५०,०००/- ( अक्षरी रुपये सात लक्ष पन्नस हजार फक्त) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर लेखाशिर्ष मागणी क्र झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०८०९१६४९१२८४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.08.09 16:50:51 +05'30'

**( अनिरुध्द सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
११. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती, सां.का.४.